वितरण आदेश क्र. १७

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,नाथनगर, पैठण औरंगाबाद, या संस्थेच्या सांस्कृतिक सभागृहाच्या शेजारी असलेल्या जुने गोडावून याचे ग्रंथालय व पाळणाघर इमारतीमध्ये रुपांतरीत करण्याकरिताच्या कामांस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणे व निधी वितरीत करणेबाबत.
(योजनांतर्गत सन २०१६-१७)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०१६/प्र.क्र.१९१ /१६/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ३० मार्च, २०१७

संदर्भ :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/ प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि.६ एप्रिल, २०१६
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ - ३, दि.२० एप्रिल, २०१६.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१६/ प्र.क्र.५२ /२०१६/२५, दि.२२ एप्रिल, २०१६
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ - ३, दि.८ फेब्रुवारी २०१७.
५. सचालक, मराठवाडा प्रबोधिनी पैठण औरंगाबादयांचे क्रमांक२०१६ मप्रविप्रप्र / आस्था/इमारत/३३४ ,दि. १९.९.२०१६ चे पत्र.

प्रस्तावना :-

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेस सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षाकरिता मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण, (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (योजनांतर्गत) (२०७० ०६७५) या लेखाशिर्षाखाली रु. १०५.०० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी संदर्भाधीन क्र.२ च्या दि.२०.४.२०१६ च्या परिपत्रकानुसार ८०% च्या मर्यादेत सदर तरतूदीनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर **रु.८४,००,००० /- (रुपये चौ-याऐशी लाख फक्त) इतके अनुदान संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूरीकरिता उपलब्ध करून दिले आहे.** संदर्भाधीन क्र.४ च्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या योजनांतर्गत खर्चासाठी संपूर्ण अनुदान खर्चासाठी नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे.

२. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने, संस्थेच्या आवारातील सांस्कृतिक सभागृहाच्या शेजारी असलेल्या जुने गोडावून याचे ग्रंथालय व पाळणाघर इमारतीमध्ये रुपांतरीत करण्याकरिता **रु. ९४,५२,७४३.००** एवढया रकमेच्या कामांसाठी प्राथमिक स्वरुपाच्या अंदाजपत्रकान्वये निधीची मागणी केली आहे. त्या अनुषंगाने संस्थेच्या सदर कामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येऊन निधी वितरित करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या योजनांतर्गत खर्चासाठी संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने, रु.८४.०० लाख इतका निधी वितरित करण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध आहे.

२. प्रस्तुत कामांचे अंदाजपत्रक मंत्रालयीन सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून, प्रस्तुत कामांच्या अंदाजपत्रकांची (**रु. ९५,६३,९१६ .०० ) पूर्णांकांत रु.९५.६४ लाख** इतकी बाबनिहाय रक्कम खालीलप्रमाणे निश्चित केली आहे.

Recapitulation Sheet

| Sr.No. | Essential Sheet | Cost in Rs. |
|---|---|---|
| १ | २ | ४ |
| 1 | Cost of Work Portion | 5294936.00 |
| 2 | Electrification (11%) | 582443.00 |
| 3 | Add 8 % Water supply and sanitation | **423595.00** |
| 4 | **Compound /Wall** | 500000.00 |
| 5 | **Road and Landscape** | 1987796.00 |
| | **Total** | **8788770.00** |
| 4 | Add 4 % Contingencies on civil works cost | 351551.00 |
| 5 | Add 2 % Architectural Fees ( On proper building cost) | 105899.00 |
| | Add 15% Service Tax on 40 % cost of proper building | 317696.00 |
| | **Total Rs** | **9563916.00** |
| | **Total Rs** | **95.64 lakhs** |

३. उपरोक्त तक्त्यातील संस्थेच्या बाबनिहाय कामांच्या अनुषंगाने किंमत निश्चित करतांना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून खालील बाबी नमूद करण्यात आल्या आहेत.

अ. सदर प्रस्तावित इमारत तळमजला अशी प्रस्तावित असून त्याचे प्रस्तावित बांधकाम क्षेत्रफळ ३१९.४२ प्रति चौ.मी. इतके आहे.

ब. सदर कामाचे नकाशे खाजगी वास्तुशास्त्रज्ञ, ( Architect Maya Vaidya ) यांनी तयार केले आहेत.

क. सदर कामाचा सरासरी दर रु.१७७२६.३०चौ.मी. असा आहे.

ड. सदर अंदाजपत्रक उपविभागीय अभियंता सा.बां. उप विभाग, पैठण यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा.बा.वि. औरंगाबाद, तसेच उपभोक्त्या खात्याच्या अधिका-यांनी साक्षांकित केले आहे.

इ सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने कार्यवाही करत असताना उपभोक्त्या विभागामार्फत सा.बां.विभाग शासन निर्णय क्र. बीडीजी २०१४/प्रक्र.९६/इमा.३ दि.८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात आली आहे, असे सा.बां. विभागामार्फत गृहीत धरण्यात आले आहे.

फ प्रस्तूत अंदाजपत्रक व नकाशे यावर सा.बां. विभागाच्या सक्षम अधिका-यांचे साक्षांकन करुन घेणे बंधनकारक आहे.

ग काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी. प्रस्तूत कामाचे नकाशे शासकीय वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून मंजूर करुन घेणे यावेत.

ह ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तांत्रिक कक्ष १, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करावी.

वरीलप्रमाणे आवश्यक सुधारणा व दुरुस्त्या करुन सार्वजनिक बांधकाम विभागाने, प्रस्तुत कामांसाठी, उपरोक्त अटीच्या अधीन राहून **रु. ९५,६३,९१६ .०० पूर्णांकांत रु.९५.६४ लाख (अक्षरी रुपये पंच्याण्णव लाख , चौसष्ठ हजार फक्त )** इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्यानुसार, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर ) पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेंच्या परिसर व इमारतीतील विविध कामानुसार परिच्छेद क्र.२ मधील तक्त्यातील रकाना क्र.४ नुसार निश्चित केलेल्या **रु. ९५,६३,९१६ .०० पूर्णांकांत रु.९५.६४ लाख ( अक्षरी रुपये पंच्याण्णव लाख , चौसष्ठ हजार फक्त )** इतक्या रकमेच्या प्रस्तावास वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्र. ४, परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या, प्रस्तावनेतील परिच्छेद ३ मध्ये नमूद केलेल्या अटींनुसार याव्दारे **प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे. तसेच, रु.८४.०० लाख इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.**

५. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेंच्या वरील कामांसाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले **एकूण रु. ८४,००,०००/- ( रुपये चौ-याऐंशी लाख फक्त ) एवढा योजनांतर्गत निधी सहायक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येत आहे.**

६. यावर होणारा **एकूण रु. ८४,००,०००/- ( रुपये चौ-याऐंशी लाख फक्त )** इतका खर्च मागणी क्र. ए - ४ मुख्य लेखाशीर्ष " २०७०-इतर प्रशासनिक सेवा- ००३ प्रशिक्षण राज्य योजनांतर्गत योजना (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहायक अनुदान (२०७० ०६७५) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर )" या लेखाशिर्षाखाली २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. सदरहू संस्थेने मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

८. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

९. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०. प्रस्तुत शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौ.संदर्भ क्र.१८४/१७ इमारती-३, दि.२१.३.२०१७, तसेच, वित्त विभगाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ- ३, दि.२० एप्रिल, २०१६. अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच त्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१८५२२५८८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2017.03.30 18:54:22 +05'30'

(अजित देशमुख)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) मा. अ.मु. स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
५) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर पैठण, औरंगाबाद.
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.
९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१०) नियोजन विभाग, ( कार्या-१४४३) मंत्रालय, मुंबई
११) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ).